

# महाराष्ट्र शासन
## गृह विभाग

**शासन ज्ञापन क्रमांक : दुरुस्ती-०१२२/प्र.क्र.४०/पोल-७.**

मंत्रालय, दुसरा मजला, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०० ०३२.

दिनांक : १० मार्च, २०२२.

**<u>विषय</u> :- पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई, यांच्या अधिपत्याखालील भोईवाडा पोलीस ठाणे हद्दीतील भोईवाडा पोलीस वसाहत ए आणि बी या इमारतींचे स्थापत्यविषयक दुरुस्ती कामांकरीता प्रशासकीय मान्यता मिळणेबाबत.**

**<u>संदर्भ</u>** :- पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई, यांच्या कार्यालयाचे पत्र क्र. CP/ACS(H)/D-८(४)/Bldg.Br./LSJ/Gov-७९/२०२१, दिनांक १७/०३/२०२१.

**ज्ञापन.-**

पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई, यांनी **भोईवाडा पोलीस ठाणे हद्दीतील भोईवाडा पोलीस वसाहत ए आणि बी यां इमारतींचे स्थापत्यविषयक दुरुस्ती कामांकरीता** अधिक्षक अभियंता, मुंबई (सा.बां.) मंडळ, मुंबई यांचेकडून प्राप्त झालेले **रु.१,११,७४/८२४/- (रुपये एक कोटी अकरा लाख चौऱ्याहत्तर हजार आठशे चोविस फक्त) इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास** प्रशासकीय मान्यता मिळणेबाबतचा पुढीलप्रमाणे प्रस्ताव सादर केला आहे.

| अ.क्र.<br>*(१)* | कामाचे नाव<br>*(२)* | खर्चाचे अंदाज<br>*(३)* |
|---|---|---|
| १. | Bhoiwada Police colony A and B wing (Repair to internal plaster, painting, kitchen otta, doors and windows, flooring etc.) | ₹१,११,७४,८२४/- |
| **एकूण- (रुपये एक कोटी अकरा लाख चौऱ्याहत्तर हजार आठशे चोविस फक्त)** | | **₹१,११,७४,८२४/-** |

२. उक्त कामासाठी उप अभियंता, उत्तर (सा.बां.) उप विभाग, दादर, मुंबई-२८ यांनी सन २०२०-२१ च्या सार्वजनिक बांधकाम विभागाच्या ई-दरसूचीनुसार तयार केलेले एकूण **₹१,११,७४,८२४/-**इतक्या खर्चाचे अंदाज सादर केले असून ते कार्यकारी अभियंता, मध्य मुंबई (सा.बां.) विभाग, वरळी, मुंबई यांनी साक्षांकित केले आहेत. तसेच सदर अंदाजपत्रकास मुख्य अभियंता, सा.बा. मुंबई विभाग यांनी तांत्रिक मान्यता प्रदान केली आहे.

३. त्या अनुसार **भोईवाडा पोलीस ठाणे हद्दीतील भोईवाडा पोलीस वसाहत ए आणि बी यां इमारतींचे स्थापत्यविषयक दुरुस्ती कामांकरीता** अधिक्षक अभियंता, मुंबई (सा.बां.) मंडळ, मुंबई यांचेकडून प्राप्त झालेले **रु.१,११,७४/८२४/- (रुपये एक कोटी अकरा लाख चौऱ्याहत्तर हजार आठशे चोविस फक्त)** इतक्या खर्चाच्या अंदाजास, पुढील अटींवर, याद्वारे, प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे:-

१) निधी उपलब्ध झाल्याशिवाय काम सुरू करू नये.
२) खर्चाचे अंदाज हे पोलीस सह आयुक्त (प्रशासन), बृहन्मुंबई, यांनी साक्षांकित करणे आवश्यक आहे.

**४.** उक्त रक्कम अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई येथून आहरित करण्यासाठी पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई, मुंबई यांना **“नियंत्रक अधिकारी”** म्हणून घोषित करण्यात येत आहे.तर त्यांच्या अधिनस्त आहरण व संवितरण अधिकाऱ्याला **”आहरण व संवितरण अधिकारी”** म्हणून घोषित करण्यात येत आहेत.

**५.** उक्त कामासाठी येणारा खर्च हा गृह विभाग--मागणी क्र. बी-१, २०५५, पोलीस, ००, १०८, राज्य मुख्यालय पोलीस, (०२) शहर पोलीस, (०२)(०१) शहर पोलीस-आस्थापना (दत्तमत)(अनिवार्य) (२०५५ ००९७), २७, लहान बांधकामे, याखाली त्या - त्या वर्षात उपलब्ध होणाऱ्या अनुदानातून भागविण्यात यावा.

**६.** हे ज्ञापन, शासन निर्णय वित्त विभाग क्र.विअप्र-२०१३/प.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२ दिनांक १७ एप्रिल, २०१५ व दिनांक २० सप्टेंबर, २०१९ अन्वये वित्तीय अधिकार नियमपुस्तिका, १९७८, भाग-पहिला, उपविभाग-पाच प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारान्वये व सार्वजनिक बांधकाम नियमपुस्तिकेतील परि.क्र.१३४ (३) मधील तरतुदीनुसार शासन परिपत्रक, सार्वजनिक बांधकाम विभाग, क्र.संकीर्ण-२०१९/प्रक्र१०/इमा-२, दि.२५.०९.२०१९ मधील तरतूदीनुसार व शासन निर्णय वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दिनांक २४ जून, २०२१ अन्वये दिलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

**७.** हे ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या *www.maharashtra.gov.in* या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०२२०३१११२५६०५५२२९ असा आहे. हे ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NARAYAN BIRA MANE

Digitally signed by NARAYAN BIRA MANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=ï¿¿HOME DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=1dfb457576797050f19aafaa495673fc843c789942459cd39fc5561071b4a70c, pseudonym=D53E4970DA18F4240576F3F34F92F7E069E6A52A, serialNumber=79C09BA352C5B3E65B259113F1CDCFAB29FB961D4EA9A24411D7F622D2ED20BF, cn=NARAYAN BIRA MANE
Date: 2022.03.11 12:57:52 +05'30'

**( नारायण बिरा माने )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई.

**प्रत-**

१) अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, मुंबई.
२) कार्यकारी अभियंता, मध्य मुंबई (सा.बां.) विभाग, वरळी, मुंबई.
३) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
४) निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
५) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई.
६) कार्यासन अधिकारी (इमा-२), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
७) कार्यासन अधिकारी (व्यय-७/ विनियम), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
८) निवड फाईल (पोल-७).